**<u>सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केंद्र शासन पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत दुसऱ्या टप्प्यात निवडण्यात आलेल्या राज्यातील पाच स्मार्ट शहरांना स्मार्ट सिटी प्रस्तावांची अंमलबजावणी करण्याकरीता प्रथम वर्ष द्वितीय हप्त्यातील निधीचे वितरण (राज्य हिस्सा).</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. स्मार्टसि-२०१७/प्र.क्र. २२०/नवि-२३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १८ मे, २०१७

**<u>संदर्भ</u>**:-(१) शासन निर्णय क्र.स्मार्टसि.-२०१७/ प्र.क्र. ६१/नवि-२३, दिनांक ०१.०३.२०१७
(२) शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७
(३)केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (२)/२०१५-एससी-१, दिनांक २०.०४.२०१७
(४) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (७)/२०१५-एससी-१, दिनांक २०.०४.२०१७
(५) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (८)/२०१५-एससी-१, दिनांक २०.०४.२०१७
(६) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (९)/२०१५-एससी-१, दिनांक २०.०४.२०१७
(७) केंद्र शासन पत्र क्र. के-१५०१६/१२/२०१७-एससी-१, दिनांक २७.०४.२०१७

**<u>प्रस्तावना:-</u>**

केंद्र शासन पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत दुसऱ्या टप्प्यात निवडलेल्या राज्यातील कल्याण-डोंबिवली, नागपुर, नाशिक, ठाणे व औरंगाबाद या पाच शहरांकरीता प्रकल्प निधी, राज्य हिस्सा, एकुण रुपये २५५.०० कोटी (प्रथम वर्ष द्वितीय हप्ता समरुप हिस्सा) इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

केंद्र शासन पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत दुसऱ्या टप्प्यात स्पर्धात्मक पध्दतीने निवडण्यात आलेल्या कल्याण-डोंबिवली (रु. ९६.०० कोटी), नागपुर (रु. ९६.०० कोटी), नाशिक (रु. ९६.०० कोटी), ठाणे (रु. १२६.०० कोटी) व औरंगाबाद (रु. ९६.०० कोटी) या पाच शहरांना अभियांनातंर्गत प्रकल्प राबविण्याकरीता केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. १ ते ५ नुसार एकूण रुपये ५१०.०० कोटी इतका निधी राज्य शासनास उपलब्ध केला आहे.

०२. स्मार्ट सिटी अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाच्या एकूण प्राप्त निधीच्या ५० % रक्कम म्हणजेच रुपये २५५.०० कोटी इतका निधी उक्त पाच शहरांना वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार बीडीएस प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत पाच स्मार्ट शहरांसाठी प्रत्येकी पुढील प्रमाणे निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटी)

| अ. क्र | नागरी स्थानिक स्वराज संस्था | केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी | राज्य शासन हिस्सा (केंद्र शासनाकडून उपलब्ध निधीच्या ५०%) |
|---|---|---|---|
| १ | कल्याण-डोंबिवली | ९६.०० | ४८.०० |
| २ | नागपुर | ९६.०० | ४८.०० |
| ३ | नाशिक | ९६.०० | ४८.०० |
| ४ | ठाणे | १२६.०० | ६३.०० |
| ५ | औरंगाबाद | ९६.०० | ४८.०० |
| **एकूण** | | **५१०.००** | **२५५.००** |

त्यानुसार प्रत्येक महानगरपालिका यांचे नावे खालील तक्त्यात नमुद केल्यानुसार संबंधित महानगरपालिकेच्या विशेष उद्देश वहन (एस.पी.व्ही.) यांच्या PFMS linked बँक खात्यावर इ.सी.एस./आर.टी.जी.एस. काढण्यात यावा.

| अ. क्र. | महानगरपालिकांची नावे | | रुपये |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका | Commissioner, Kalyan-Dombivali Municipal Corporation, | ४८,००००००/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस कोटी फक्त) |
| २ | आयुक्त, नागपुर महानगरपालिका | Commissioner, Nagpur Municipal Corporation | (४८,००००००/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस कोटी फक्त) |
| ३ | आयुक्त, नाशिक महानगरपालिका | Commissioner, Nashik Municipal Corporation | ४८,००००००/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस कोटी फक्त) |
| ४ | आयुक्त, ठाणे महानगरपालिका | Commissioner, Thane Municipal Corporation | ६३,००००००/- (अक्षरी रुपये त्रेसष्ट कोटी फक्त) |
| ५ | आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका | Commissioner, Aurangabad Municipal Corporation | ४८,००००००/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस कोटी फक्त) |

०३ याकरीता श्री.अनिष परशुरामे, उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्रीमती शैलजा स. शिरोडकर, कक्ष अधिकारी, (नवि-५) नगर विकास विभाग, यांना आहारण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम परिच्छेद क्र.२ मध्ये नमुद केलेल्या विवरण पत्रातील संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी करावयाची आहे.

०४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक, अर्थसं-२०१७/ प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ तथा वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२३७/अर्थोपाय, दिनांक १७.०५.२०१७ च्या मंजूरी अन्वये निधी वितरीत करण्यास देण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याची मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

**(अ)** उक्त निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, विशेष उद्देश वहन (एस.पी.व्ही.) यांच्या PFMS linked बँक खात्यावर वितरीत करण्यात येत असून, निधी प्राप्त झाल्याची खात्री करण्याची प्राथमिक जबाबदारी संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांची राहील.

**(ब)** शासन निर्णय दिनांक १८.०६.२०१६ व केंद्र शासनाच्या स्मार्ट सिटी अभियानाच्या मार्गदर्शक सुचना क्र. ११ व १२ मधील अटींची पुर्तता केल्यानंतरच ठाणे स्मार्ट सिटी लिमिटेड, नागपुर स्मार्ट ॲन्ड सस्टेनेबल सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन, औरंगाबाद स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड, नाशिक म्युनिसिपल स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन व स्मार्ट कल्याण-डोंबिवली डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड या पाच विशेष उद्देश वहनांना सदर निधीचा विनियोग करण्याची जबाबदारी संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांची असेल.

**(क)** सदर निधीचा प्रकल्पाव्यतिरिक्त इतर बाबींवरील खर्चासाठी वापरता येणार नाही व तसे झाल्यास ही आर्थिक अनियमितता मानली जाईल, अशा अनियमिततेसाठी संबंधित महानगरपालिका आयुक्तांची पूर्णपणे जबाबदार राहिल.

**(ड)** सदर निधीचा विनियोग ज्या कारणांसाठी निधी मंजूर केला आहे त्याच कारणांसाठी करण्यात यावा. सदर निधी खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र, तसेच प्रकल्पाचे उद्दिष्ट व साध्य याची माहिती केंद्र शासनाने विहित केल्याप्रमाणे सादर करणे बंधनकारक राहील.

**(ई)** संबंधित स्मार्ट शहरांच्या महानगरपालिकांनी ५०:२५:२५ (केंद्र:राज्य:नागरी स्थानिक स्वराज्य संस्था) या सुत्राप्रमाणे त्यांच्या हिश्याची रक्कम विशेष उद्देश वहनाच्या बँक खात्यात विहित मुदतीत जमा करणे बंधनकारक राहिल. याबाबतची संपुर्ण जबाबदारी संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांची राहिल.

०६. उपरोक्त विवरणपत्रामध्ये नमूद रूपये २५५,००,००,०००/- (रूपये दोनशे पंचावन्न कोटी फक्त) इतक्या रक्कमेचा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, १९१-महानगरपालिकांना सहाय्य, केंद्र सहाय्यक अनुदानीत योजना (००) (८२) स्मार्ट सिटी अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (२२१७ ९९२१), ३१, सहाय्यक

अनुदाने (वेतनेतर), दत्तमत, या लेखशिर्षामधून सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०५१९११४०१४६७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Anish Raman Parshurame

Digitally signed by Anish Raman Parshurame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5ec58fef33f1b3244a3957d134f915dcb444ab4953880ff670e5eca3d7a9f53b, cn=Anish Raman Parshurame
Date: 2017.05.19 11:48:27 +05'30'

**(अनिष परशुरामे)**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग,
१०. अप्पर मुख्य सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
१५. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपुर
१६. सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे स्मार्ट सिटी लिमिटेड/नागपुर स्मार्ट ॲन्ड सस्टेनेबल सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन/औरंगाबाद स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड/नाशिक म्युनिसिपल स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन/स्मार्ट कल्याण-डोंबिवली डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड
१८. आयुक्त ठाणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/कल्याण-डोंबिवली महानगरपालिका.
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक जिल्हा
२०. जिल्हा प्रशासन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, ठाणे/औरंगाबाद/नागपूर/ नाशिक जिल्हा
२१. निवड नस्ती, नवि-२३